**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ करीता अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना जनजाती उपयोजना निधीच्या ५ टक्के निधी (पेसा) या योजनेकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**
**(लेखाशिर्ष - २५०१ २९७१)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.८/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.८/कार्या-६, दि.६.९.२०२४.
४) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.पेसाअ-२०२४/प्र.क्र.८०/पंरा-२.

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागामार्फत जिल्हा स्तरावरुन अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना जनजाती उपयोजना निधीच्या ५ टक्के निधी (पेसा) या योजनेसाठी राज्यस्तरावर पेसा कक्ष कार्यरत आहे. या कक्षातील अधिकारी, कर्मचारी यांचे वेतन, भत्ते व मानधन तसेच कार्यालयीन खर्चाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र. ४ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावावर वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २५०१-ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम या मुख्य लेखाशीर्षाखाली **अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना जनजाती उपयोजना निधीच्या ५ टक्के निधी (पेसा) या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून** खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना जनजाती उपयोजना निधीच्या ५ टक्के निधी (पेसा) | २५०१ २९७१ | ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ६००.०० | १८०.०० | १८०.०० |

२. उपरोक्तप्रमाणे **रु.१८०.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांत दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. उपरोक्त वितरीत निधी ज्या कारणासाठी वितरीत करण्यात आला आहे, त्यासाठीच वापरण्यात यावा. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून फक्त आदिवासी लाभार्थ्यांनाच लाभ देण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

७.  सदर शासन निर्णय वित्त विभागाचा ई-ऑफिस नस्ती क्र.९२९३२१, टिपणी क्र.२०-२६, दि.०७.०२.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२८१६५६३१०२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA
DEVARAM
BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.02.28 16:58:02 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई .
४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग (ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती)
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. सर्व प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.)
१०.अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.ग्रामविकास विभाग, योजना-१०, मंत्रालय, मुंबई.
१४.कार्यासन अधिकारी, (का.१७)
१५.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.